शहीद जवानांच्या मुलांसाठी श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यासामार्फत केजी टू पीजी शिष्यवृत्ती योजना "एक विशेष बाब" म्हणून सुरु करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

## शासन निर्णय क्र. एसव्हीटी -१११९/५४९/प्र.क्र.११३/का.१६

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०९ सप्टेंबर, २०२०.

**संदर्भ:-** १) श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई यांचे पत्र क्र. सिविगंम/२८१/ २०१९, दि.२०.०६.२०१९.
२) श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई यांचे पत्र क्र. सिविगंम/३७३/ २०१९, दि.२०.०७.२०१९.
३) विधि व न्याय विभागाचा समक्रमांकाचा दि.२० सप्टेंबर,२०१९ चा शासन निर्णय.

**शासन निर्णय:-**

या शासन निर्णयान्वये संदर्भाधिन क्र.३, दि.२०.०९.२०१९ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करुन शहीद जवानांच्या मुलांसाठी श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यासामार्फत केजी टू पीजी या शिष्यवृत्ती योजनेच्या सुधारित अटी व निकषासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

शहीद जवानांच्या मुलांना "केजी टू पीजी शिष्यवृत्ती योजना" **एक विशेष बाब** म्हणून श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यासामार्फत राबविण्यास या शासन निर्णयान्वये पुढील अटी व निकष यांच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे:-

१) "केजी टू पीजी शिष्यवृत्ती योजना" या योजनेंतर्गत महाराष्ट्राचे अधिवास असलेला जवान देशात कुठेही दहशतवादी हल्ल्यात शहीद झाल्यास तसेच जिल्हाधिकारी कार्यालयाने प्रमाणित केलेले महाराष्ट्राचे अधिवास प्रमाणपत्र(Domicile Certificate) ज्या दहशतवादी हल्ल्यातील शहीद जवानांकडे / पाल्यांकडे आहे, त्यांनाच "के.जी. टू पी. जी. शिष्यवृत्ती योजने" च्या लाभास पात्र समजण्यात यावे. सदर प्रस्ताव जिल्हाधिकारी यांनी प्रमाणित करुन पात्र असलेले अर्ज जिल्हाधिकारी कार्यालयामार्फत न्यासाकडे येणे आवश्यक राहील.

२) जिल्हाधिकारी यांनी प्रमाणित केलेले पात्र प्रस्ताव न्यास समितीची मंजुरी प्राप्त झाल्यानंतर संबंधित लाभार्थी यांना निधी वितरीत करण्यात येईल.

३) शासनाच्या कोणत्याही अन्य शिष्यवृत्ती योजनेचा पूर्वीपासून लाभ घेत असलेल्या शहीद जवानांच्या मुलांना या शिष्यवृत्ती योजनेचा दुबार लाभ या दृष्टीकोनातून "केजी टू पीजी शिष्यवृत्ती योजना" या योजनेंतर्गत शैक्षणिक शुल्काची रक्कम मिळण्यास पात्र राहणार नाहीत.

४) "के.जी. टू पी.जी. शिष्यवृत्ती योजना" या योजनेंतर्गत कोणत्याही माध्यमातून अनुदानित किंवा विनाअनुदानित शिक्षण संस्थेत शिक्षण घेत असलेल्या शहीद जवानांची मुले शैक्षणिक शुल्काची रक्कम मिळण्यास पात्र असतील.

५) "के.जी. टू पी.जी. शिष्यवृत्ती योजना" या योजनेंतर्गत निवासी शाळेत, सैनिकी शाळेत शिक्षण घेत असलेल्या शहीद जवानांच्या मुलांना शैक्षणिक शुल्काची रक्कम मिळण्यास पात्र समजण्यात यावे. सबब, निवासी शाळेत, सैनिकी शाळेत शिक्षण घेणाऱ्या मुलांच्या शैक्षणिक शुल्कातील भोजन आणि निवास खर्च प्रस्तावित केल्यास सदर खर्च या शिष्यवृत्ती योजनेत प्रदान करण्यात येईल.

६) शालेय शिक्षण घेत असलेल्या के.जी. ते दहावीच्या विद्यार्थ्यांच्या बाबतीत शहीद जवानांच्या पत्नीच्या (शहीदाची पत्नी नसल्यास मुलाचे पालक असलेली व्यक्ती) बँक खात्यात शैक्षणिक शुल्काची रक्कम जमा करण्यात यावी. मात्र, महाविद्यालयीन व त्यापुढील शिक्षण घेणाऱ्या मुलांच्या बाबतीत त्यांच्या वैयक्तिक बँक खात्यावर रक्कम जमा करण्यात येईल.

७) शालेय,कनिष्ठ महाविद्यालय,वरिष्ठ महाविद्यालय,पारंपारिक विद्यापीठे, अभियांत्रिकी शाखा, वैद्यकीय शाखा, पशु वैद्यकीय शाखा, कृषी शाखा व तत्सम शाखेत शिक्षण घेत असलेले विद्यार्थी या योजनेअंतर्गत शैक्षणिक शुल्काची रक्कम मिळण्यास पात्र राहतील.

८) "के.जी. टू पी.जी. शिष्यवृत्ती योजना" या योजनेकरिता रु.१ कोटी इतक्या मर्यादेत खर्च करण्याचे अधिकार श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर व्यवस्थापन समिती, प्रभादेवी, मुंबई यांना असतील.

९) या योजनेचा लाभ घेण्यासाठीचा नमुना व्यवस्थापन समितीच्या मान्यतेने तयार करण्यात यावा व अर्जाचा नमुना तसेच योजनेची माहिती न्यासाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावी.

१०) या योजनेचा लाभ घेण्यासाठी अर्जदाराने विहित नमुन्यात आवश्यक त्या कागदपत्रांसह त्या-त्या जिल्ह्याच्या जिल्हाधिकारी कार्यालयाकडे अर्ज सादर करावा.

११) हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून व पुढे दहशतवादी हल्ल्यात शहीद झालेल्या जवानांची मुले "के.जी. टू पी.जी. शिष्यवृत्ती योजना" या योजनेंतर्गत लाभार्थी म्हणून पात्र ठरतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२००९२५१३३४२२९८१२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUNITA PARAG SALUNKE

Digitally signed by SUNITA PARAG SALUNKE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9ee0eef2d14d407f36dd3610d7d17b19cc85c5da3c6493dd1b6379b15e3372e, serialNumber=8f3e3dd76ae275cc1afa0c0be4edf609c0420709b30d7478f9b8cff1b4acde7d, cn=SUNITA PARAG SALUNKE
Date: 2020.09.25 13:34:52 +05'30'

**( सु. प. साळुंके )**
कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग.

**प्रति:-** १) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) सर्व जिल्हाधिकारी
४) कार्यकारी अधिकारी, श्री सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई.
५) निवड नस्ती/का.१६.